**विभागातील अधीक्षक अभियंता (यांत्रिकी) या संवर्गाची दि.०१.०१.२०२४ रोजीची तात्पुरती ज्येष्ठता यादी प्रसिध्द करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक : अअज्ये १२२४/प्र.क्र.२१/२०२४/आ(वर्ग-१)**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई -४०० ०३२.
दिनांक : ०३ जुलै, २०२४

**वाचा :**

१) महाराष्ट्र नागरी सेवा (ज्येष्ठतेचे विनियमन) नियमावली, २०२१, दि.२१.०६.२०२१
२) जलसंपदा विभाग, शासन परिपत्रक क्रमांक:अअज्ये १२२३/प्र.क्र.९९/२०२३/ आ(वर्ग-१), दि.१६.०५.२०२३

**शासन परिपत्रक :**

महाराष्ट्र नागरी सेवा (ज्येष्ठतेचे विनियमन) नियमावली, २०२१ अन्वये शासन सेवेतील अधिकारी /कर्मचाऱ्यांची ज्येष्ठतायादी प्रत्येक वर्षी तयार करणे व प्रसिध्द करणे यांबाबतचे सर्वंकष धोरण/नियम निश्चित करण्यात आलेले आहे. त्यानुसार संदर्भ क्र.२ येथील दि.१६.०५.२०२३ रोजीच्या परिपत्रकान्वये अधीक्षक अभियंता (यांत्रिकी) या संवर्गाची दि.०१.०१.२०२३ रोजीची तात्पुरती ज्येष्ठतायादी प्रसिद्ध करण्यात आली आहे.

२. आता, जलसंपदा विभागातील अधीक्षक अभियंता (यांत्रिकी) या संवर्गाची दि.०१.०१.२०२४ रोजीची स्थिती दर्शविणारी तात्पुरती ज्येष्ठतायादी सामान्य प्रशासन विभागाने निश्चित केलेल्या वरील नियमावलीनुसार सोबत जोडलेल्या **परिशिष्ट-अ** प्रमाणे प्रसिध्द करण्यात येत आहे.

३. सदर दि.०१.०१.२०२४ रोजीची अधीक्षक अभियंता (यांत्रिकी) संवर्गाची तात्पुरती ज्येष्ठतासूची ही मा.उच्च न्यायालयाने याचिका क्र.२७९७/२०१५ मध्ये दिलेल्या न्यायनिर्णयानुसार तसेच, यासंदर्भात मा. सर्वोच्च न्यायालयामध्ये दाखल केल्या गेलेल्या व प्रलंबित असलेल्या विशेष अनुज्ञा याचिका क्र. २८३०६/२०१७ वरील अंतिम न्यायनिर्णयाच्या अधीन राहून प्रसिध्द करण्यात येत आहे. उपरोक्त न्यायालयीन प्रकरणांमधील न्यायनिर्णयानुसार सन २००४ नंतरच्या निवडयाद्यांमध्ये बदल झाल्यास त्यानुसार ज्येष्ठतायादीमध्ये बदल होईल.

४. सदर ज्येष्ठता यादीबाबत काही त्रुटी/आक्षेप असल्यास हे परिपत्रक निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून १५ दिवसांत लेखी स्वरुपात आवश्यक त्या कागदपत्रांसह विहित मार्गाने शासनाच्या निदर्शनास आणाव्यात.

५. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून, त्याचा संकेतांक २०२४०७०३१७१३३०१९२७ असा आहे. तसेच सदर शासन परिपत्रक जलसंपदा विभागाच्या wrd.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर देखील उपलब्ध करण्यात आलेले आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने स्वाक्षांकीत करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

**सोबत :** परिशिष्ट-अ.

RAKHI SACHIN CHAVAN

Digitally signed by RAKHI SACHIN CHAVAN
DN: CN = RAKHI SACHIN CHAVAN, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = WATER RESOURCES DEPARTMENT
Date: 2024.07.03 17:25:31 +05'30'

**( राखी चव्हाण )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. उपमुख्यमंत्री (जलसंपदा) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई
२. अ.मु.स.(जलसंपदा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
३. सचिव (लाक्षेवि/ प्रकल्प समन्वय), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. मुख्य अभियंता (यांत्रिकी), जलसंपदा विभाग, नाशिक
५. सर्व अधीक्षक अभियंता (यांत्रिकी), जलसंपदा विभाग.
६. सर्व कार्यकारी अभियंता (यांत्रिकी), जलसंपदा विभाग.
७. कार्यासन आ(वर्ग-१) संग्रहार्थ.

शासन परिपत्रक क्रमांक : अअज्ये १२२४/प्र.क्र.२१/२०२४/आ(वर्ग-१), दि.०३.०७.२०२४ सोबतचे परिशिष्ठ

## परिशिष्ट- अ

१) संवर्गाचे नांव :- अधीक्षक अभियंता (यांत्रिकी)

२) वेतनश्रेणी :- एस-२५ (७८८००-२०९२००)

३) दिनांक ०१.०१.२०२४ रोजीची अधीक्षक अभियंता (यांत्रिकी) संवर्गाची तात्पुरती ज्येष्ठतायादी

| अ.क्र. | ज्येष्ठता क्रमांक | अधिकाऱ्याचे नाव (सर्वश्री.) | नियुक्तीचा मार्ग | जन्म दिनांक | प्रवर्ग | अधीक्षक अभियंता (यांत्रिकी) या संवर्गातील पदोन्नतीच्या आदेशाचा दिनांक | ज्येष्ठतेचा दिनांक/मानीव दिनांक | सेवा निवृत्तीचा दिनांक | शैक्षणिक अर्हता | शेरा |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | १ | पुंडलिक मैसाजीराव थोटवे | पदोन्नती | ०५.०७.१९६५ | अ.जा. | २१.०९.२०१६ | ०१.१०.२०१६ | ३१.०७.२०२३ | बी.ई. | सेवानिवृत्त |
| २ | २ | विलास एकनाथराव गायकवाड | पदोन्नती | १३.११.१९६५ | अ.जा. | १७.०६.२०१७ | २३.०६.२०१७ | ३०.११.२०२३ | बी.ई. | सेवानिवृत्त |
| ३ | ३ | जितेंद्र मधुकर गंटावार | पदोन्नती | ०८.०१.१९७० | भ.ज.(ब) | १४.११.२०१८ | १६.११.२०१८ | ३१.०१.२०२८ | बी.ई. | |
| ४ | ४ | नितीन दिनकर पोटे | पदोन्नती | ०७.०२.१९६९ | अ.जा. | १४.११.२०१८ | २०.११.२०१८ | २८.०२.२०२७ | बी.ई. | |
| ५ | ५ | राजेंद्र हरी चव्हाण | पदोन्नती | २१.०७.१९७० | अ.जा. | ०८.०३.२०२१ | ०६.०४.२०२१ | ३१.०७.२०२८ | बी.ई. | |
| ६ | ६ | रविंद्र निळकंठराव वानखडे | पदोन्नती | १९.१२.१९६९ | खुला | १८.१०.२०२१ | २१.१०.२०२१ | ३१.१२.२०२७ | बी.ई. | |

RAKHI SACHIN CHAVAN

Digitally signed by RAKHI SACHIN CHAVAN
DN: CN = RAKHI SACHIN CHAVAN, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = WATER RESOURCES DEPARTMENT
Date: 2024.07.03 17:25:56 +05'30'